आदिवासी क्षेत्र उपयोजना सन २०१६-१७ करीता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या केंद्रिय योजनांतर्गत तरतूदींचे वितरण - भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती. (२२२५ २२८२)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र. क्र. ०३ /कार्यासन.०६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख: - २० जून, २०१७.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७ /प्र.क्र.६८ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१७.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.७५ / अर्थ-३, दि. १८.०४.२०१७..
३) जनजाती कार्य मंत्रालय, भारत सरकारचे पत्र क्र. २००१४ /१६/ २०१२-शिक्षण दि.०४.०५.२०१७
४) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. शिष्यवृ-२०१७ /प्र.क्र.७४/कार्या-१२.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग, अल्पसंख्यांक यांचे कल्याण केंद्रिय योजना (०२) (०९) भारत सरकार मॅट्रिकोत्तर शिष्यवृत्ती (२२२५ २२८२), ३४ शिष्यवृत्ती व विद्यावेतने करिता एकूण रु.२५०००.०० लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे. दरम्यान, केंद्र शासनाने त्यांच्या वाचा क्र.३ येथील पत्रान्वये सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता सदर योजनेच्या दुस-या हप्त्यापोटी रु.५३२८.१६ लक्ष इतका निधी वितरीत केला आहे.

२. वाचा क्र.४ नुसार सदर केंद्रिय निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याचे वित्त विभागाने प्रमाणित केले आहे. सबब, (०२) (०९) भारत सरकार मॅट्रिकोत्त्तर शिष्यवृत्ती (लेखाशिर्ष २२२५ २२८२), ३४- शिष्यवृत्ती व विद्यावेतने याखाली रु.५३२८.१६ लक्ष ( रु.त्रेपन्न कोटी अठ्ठावीस लाख सोळा हजार फक्त ) इतकी तरतूद नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर तरतूद सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षातील प्रलंबित शिष्यवृत्ती अदा करण्यासाठी वापरण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७ नुसार प्राप्त अधिकार तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ २४२/अर्थोपाय,दि. २२.०५.२०१७ नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१५१८१५३६२३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.06.21 11:31:52 +05'30'

**भगवान सावंत**
शासनाचे अवर सचिव.

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
३. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.